यांत्रिकी संघटने अंतर्गत निविदामध्ये पश्चात अर्हता निकष निश्चित करणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक. संकिर्ण/१२१७/ (प्र.क्र.११४/१७)/ यांत्रिकी**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ०५/०७/२०१८

**वाचा:-**

१) जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्र. निविदा ०४१७/ प्र.क्र.२४७/मो.प्र-१ दि.२२/०५/२०१८

२) जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण/१११७/(प्र.क्र.१०४/१७)/यांत्रिकी, दि.१४/०३/२०१८

**प्रस्तावना :-**

यांत्रिकी संघटने अंतर्गत संयंत्रे दुरूस्ती, जलद्वारे निर्मिती उभारणी व दुरूस्ती, पंपिंग यंत्रसामुग्री उभारणी व दुरूस्ती इ. विशिष्ट स्वरूपाची व वेगवेगळी कामे केली जातात. सदर कामे बाह्य अभिकरणामार्फत करतांना कामे करणाऱ्या कंत्राटदारास सदर विशिष्ट कामांचा अनुभव असणे आवश्यक आहे. अन्यथा कामे वेळेत व गुणवत्तापूर्वक होवू शकणार नाहीत. त्यामुळे अशा विशिष्ट प्रकारचा अनुभव असलेल्या कंत्राटदारांकडून कामे होणे आवश्यक आहे.

तथापि उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये यांत्रिकी संघटनेअंतर्गत करण्यांत येणाऱ्या यांत्रिकी कामासाठी कंत्राटदार नोंदणीचा नियम रद्द करण्यांत आलेला असल्यामुळे यांत्रिकी संघटनेअंतर्गत बाह्य अभिकरणामार्फत कामे करतांना कामे गुणवत्तापूर्वक होण्यासाठी कंत्राटदाराची पश्चात अर्हता तपासणे आवश्यक आहे. उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयामध्ये स्थापत्य विभागाच्या रू. ३ कोटी वरील कामांसाठी पश्चात अर्हता निकष लावण्याची तरतूद समाविष्ट आहे. परंतु यांत्रिकी संघटनेअंतर्गत बहुतांश कामे ही रु. ५० लक्ष पर्यंतची असतात.

वरील सर्व बाबींचा विचार करता व यांत्रिकी संघटने अंतर्गत कामांचे स्वरूप पाहता उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामधील यांत्रिकी संघटनेतंर्गत कामांसाठी पश्चात अर्हता निकषाची तरतूदीची मर्यादा निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

यांत्रिकी संघटनेअंतर्गत सर्व यांत्रिकी कार्यप्रकारातील निर्मिती, उभारणी, कार्यान्वितीकरण तसेच परिचलन, देखभाल व दुरुस्ती या कामांसाठीच्या निविदेबाबत पश्चात अर्हता निकष निश्चित करतांना, संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करावी.

२. संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद 'ब'-९ मध्ये पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी.

**ब-९. कामांच्या निविदा निश्चित करताना पूर्व अर्हते ऐवजी पश्चात अर्हता पध्दतीचा अवलंब करण्याबाबत:-**

जलसंपदा विभागाच्या कामाची व्याप्ती पाहता जलसंपदा विभागाचा शासन आदेश क्र. निविदा ०४११/ (३१९/२०११)/मोप्र-१,दिनांक १८/१०/२०१४ व शुध्दीपत्रक दिनांक १०/५/२०१६ यामध्ये बदल करून खालीलप्रमाणे सुधारित सूचना देण्यात येत आहेत व प्रस्तुत निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहेत.

**९.१** जलसंपदा विभागांतर्गत यांत्रिकी संघटनेंतर्गत रु. १० लक्ष पेक्षा जास्त किंमतीच्या निविदांसाठी कामाच्या करारनाम्यात पश्चात अर्हता कार्यपध्दतीची तरतूद करण्यात यावी. कामाच्या करारनाम्यात पुढीलप्रमाणे पश्चात अर्हता तरतूद समाविष्ट असावी.

| | | | |
|---|---|---|---|
| अ. | कंत्राटदाराची मागील ५ वित्तीय वर्षातील वार्षिक सरासरी उलाढाल : | : | संबंधित कामाच्या किंमतीच्या कमीत कमी ७५ टक्के<br>(चालू दराने) |
| ब. | कंत्राटदाराने समतुल्य किंमतीचे किमान एक सदृष्य काम पूर्ण केलेले पाहिजे. अशा कामाची कमीत कमी किंमत -- | : | संबंधित कामाच्या किंमतीनुसार (चालू दराने)<br>रु. १० लक्ष पेक्षा जास्त सर्व कामांसाठी : ३० % परंतु कमीत कमी रु.५ लक्ष |
| क. | संबंधित कामासाठी कोणत्याही एका वर्षात ज्या महत्वाच्या परिमाणाच्या बाबी करावयाच्या आहेत त्याचे कमीतकमी परिमाण | : | संबंधित कामातील महत्वाच्या बाबींच्या परिमाणाच्या ३०%. |
| ड. | कंत्राटदाराची निविदा भरण्याची सक्षमता (Bid Capacity) | : | **(अे x एन x२)- बी** जेथे,<br>**अे**- गेल्या पाच वर्षातील जास्तीत जास्त वार्षिक उलाढाल<br>(चालू दराने)<br>**एन**- कामाचा कालावधी (वर्षे)<br>**बी**- हातातील कामांची किंमत<br>( कामांच्या कालावधीतील) |
| इ. | संबंधित कामांच्या विशिष्ट स्वरुपानुसार समकक्ष काम कंत्राटदारांनी कोणत्याही कालावधीत प्रत्यक्ष केलेले असणे अनिवार्य करण्यात यावे. | : | यांत्रिकी संघटनेंतर्गत सर्व यांत्रिकी कार्यप्रकारातील<br>१) द्वारे व उच्चालक - निर्मिती, उभारणी, परिचलन, देखभाल व दुरुस्ती<br>२) संयत्रे-परिचलन, देखभाल व दुरुस्ती<br>३) उपसा सिंचन योजना-पुरवठा, उभारणी, चाचणी, पंपीग यंत्रसामुग्री परिचलन, देखभाल व दुरुस्ती.<br>वरील तीन कार्यप्रकारांपैकी कोणत्याही ज्या एका स्वरुपाचे कार्य करावयाचे आहे, त्या कार्यप्रकाराचे काम |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | कंत्राटदाराने यशस्वीरित्या पूर्ण केलेले असणे अनिवार्य राहील. |
| फ. | संबंधित कामासाठी कंत्राटदाराकडे उपलब्ध असणे अपेक्षित असलेली स्वत:च्या मालकीची / भाडेतत्वावरील / Lease वरील यंत्रसामुग्री व प्रकल्प व्यवस्थापनाबाबतची व्यवस्था याचे निकष निविदा स्वीकृती करणाऱ्या सक्षम प्राधिकारी यांनी प्रत्येक प्रकरणी तपासणी करुन निश्चित करावेत. सदर यंत्रसामुग्री बांधकामाचे वेळी कार्यक्षेत्रावर उपलब्ध करण्याबात कंत्राटदाराचे बंधपत्र/हमीपत्र घ्यावे. | | |

९.२ उलाढाल, कामाची किंमत इत्यादीची परिगणना चालू दराने करताना प्रतिवर्षी १० टक्के वाढ विचारात घेण्यात यावी.

९.३. उपरोक्त (क) नुसार बाबींची निवड करताना संबंधीत कामामधील महत्वाच्या व ठळक बाबी विचारात घ्याव्यात.

९.४ हातातील कामांची उर्वरित किंमत बिनचूक व परिपूर्णरीत्या सादर करणे कंत्राटदारांवर बंधनकारक राहील. तसेच, देय कामासाठी निविदा सादर केल्यानुसार, परंतु त्यासंबधी अंतिम निर्णय होण्यापूर्वी एखादे नवीन काम मिळाल्यास त्यासंबंधीची माहिती त्वरीत सादर करणे देखील कंत्राटदारावर बंधनकारक राहील. अन्यथा नियमानुसार ते येथोचित कारवाईस पात्र राहतील.

९.५ उपरोक्त (इ) नुसार निकष निश्चित करताना समकक्ष कामाची व्याख्या नि:संदिग्ध असण्याबाबत दक्षता घ्यावी.

९.६ कामाच्या करारनाम्यात पश्चात अर्हता निकष समाविष्ट आहेत, ही बाब निविदा सूचनेमध्ये स्पष्टपणे नमूद करावी.

९.७ प्रथम लिफाफा क्रमांक १ तांत्रिक क्षमता (Technical Bid) online उघडण्यात यावे. जे कंत्राटदार तांत्रिक अर्हतेबाबत पात्र ठरतील त्यांचा लिफाफा क्र. २ आर्थिक अर्हता (Financial Bids) online उघडण्यात यावा व त्यामधील सर्व कंत्राटदारांचे दर उपस्थित कंत्राटदारांसमोर वाचण्यात यावेत.

९.८ रु.१०लक्ष व त्यावरील अंदाजित किंमतीच्या सर्व कामांसाठी पश्चात अर्हता पध्दत लागू राहील. रु.५ लक्ष ते रु.१० लक्ष अंदाजपत्रकीय किमंतीच्या कामांसाठी कंत्राटदाराची निविदा भरण्याची सक्षमता (Bid Capacity) वरील मुद्दा क्र.९.१ अंतर्गत (ड) मधील सूत्रानुसार विहित केलेल्या पध्दतीने ठरविण्यात यावी. कंत्राटदाराची निविदा भरण्याची सक्षमता (Bid Capacity) ठरविण्याचे अधिकार निविदा स्वीकृत करणा-या अधिका-यास असतील.

उपरोक्त निर्देश जलसंपदा विभागातील यांत्रिकी संघटनेतंर्गत बाह्यअभिकरणामार्फ़त करण्यात येणाऱ्या सर्व कामांकरीता लागू राहील.

सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७०५१२५९०४०६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tirmanwar Santosh Ramkishan

Digitally signed by Tirmanwar Santosh Ramkishan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf0117ad341668a72bc3fcc8a83a2fab1d9b23e2ae276141178afc4dc8b5d790, serialNumber=37b5be33c57130083d7c9245fb12e91e0019861744c920676df5a5236c14b3a2, cn=Tirmanwar Santosh Ramkishan
Date: 2018.07.05 13:03:17 +05'30'

**(सं.रा.तिरमनवार)**
**शासनाचे उप सचिव.**

**प्रत –**

१. मा.मंत्री जलसंपदा यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री जलसंपदा यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव (जलसंपदा), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. महालेख़ापाल यांचे कार्यालय ( मुंबई/ नागपूर), महाराष्ट्र राज्य.
७. वित्त विभाग /सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय.
८. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव /सर्व उपसचिव ,जलसंपदा विभाग ,मंत्रालय.
९. कार्यकारी संचालक कृष्णा / तापी / गोदावरी / विदर्भ / कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, महाराष्ट्र.
१०. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
११. अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे /कोल्हापूर / नाशिक / नागपूर / नांदेड, जलसंपदा विभाग
१२. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई.
१३. सर्व अधिकारी / कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय.
१४. यांत्रिकी संग्रहार्थ.